**सन १९९३ मध्ये आलेल्या भूकंपामुळे बाधित झालेल्या लातूर व उस्मानाबाद जिल्ह्यातील भूकंपग्रस्त गावांचे पुनर्वसनाकरिता शासनाने संपादित केलेल्या जमिनीच्या भूधारकांना भूसंपादन अधिनियम, १८९४ मधील कलम-१८ व कलम २८-अ च्या प्रकरणी मा. न्यायालयाने दिलेल्या आदेशान्वये वाढीव मोबदल्याची रक्कम मंजूर करणेबाबत.**
**(२२४५- सहायक अनूदाने)**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग (मदत व पुनर्वसन)**
**शासन निर्णय क्रमांक : आव्यप्र-२०१८/प्र.क्र.६६/आव्यप्र-२,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : १७ जानेवारी, २०१९

**<u>संदर्भ-</u>** १) शासन निर्णय, महसूल व वन विभाग (मदत व पुनर्वसन) क्रमांक:आव्यप्र-२०१६/प्र.क्र.३६/आव्यप्र-२, दि.२७ एप्रिल, २०१६
२) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक:न्याखभ-२०१५/प्र.क्र.१३१/अर्थ-२, दि.०३ जून, २०१५.
३) विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांचे आदेश...
१. जा.क्र.२०१७/ पुनर्वसन / न्या.प्र. / प्र.क्र.३९, दि.२८.०३.२०१८,
२. जा.क्र.२०१८/ पुनर्वसन / न्या.प्र. / प्र.क्र.५६, दि.१७.०२.२०१८,
३. जा.क्र.२०१८/ पुनर्वसन / न्या.प्र. / प्र.क्र.६२, दि.२७.०४.२०१८,
४. जा.क्र.२०१८/ पुनर्वसन / न्या.प्र. / प्र.क्र.३०, दि.२८.०३.२०१८,
५. जा.क्र.२०१८/ पुनर्वसन / न्या.प्र. / प्र.क्र. ५९, दि.२७.०४.२०१८,
रोजी निर्गमित केलेले आदेश.

**<u>प्रस्तावना :</u>**

सन १९९३ मध्ये आलेल्या भूकंपामुळे बाधित झालेल्या लातूर व उस्मानाबाद जिल्हयातील भूकंपग्रस्त गावांचे नवीन गावठाण पुनर्वसनासाठी शासनाने संपादित केलेल्या जमिनीच्या भूधारकांना ठरवून दिलेली जमिनीची रक्कम जिल्हा सत्र न्यायालय व मा.दिवाणी न्यायालय यांनी विविध भूसंदर्भांमध्ये वाढीव मोबदला दिलेला असल्याने या विविध प्रकरणांत शासनाने मा.उच्च न्यायालयात अपील्स दाखल केली आहेत. सदर प्रकरणांवर मा.उच्च न्यायालयाच्या झालेल्या आदेशांनुसार संबंधित भूधारकांना भूसंपादन अधिनियम, १८९४ मधील कलम १८ व कलम २८ -अ खाली सुधारीत परिगणनेनुसार वाढीव मोबदला मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

सन १९९३ मध्ये आलेल्या भूकंपामुळे बाधित झालेल्या लातूर व उस्मानाबाद जिल्ह्यातील खालील गावांच्या पुनर्वसनाकरीता शासनाने संपादित केलेल्या जमिनीचे भूधारकांनी भूसंपादन

अधिनियम १८९४ चे कलम १८ व कलम २८ अ अन्वये मा. उच्च न्यायालयाचे निर्णयानुसार वाढीव मावेजा देण्याची विनंती केली आहे. भूसंपादनाच्या खालील पाच प्रस्तावांना वाढीव मोबदला एकूण रूपये ७३,९६,२८५ /- (रूपये त्र्यहात्तर लाख शहयाण्णव हजार दोनशे पंच्याऐंशी फक्त) निधी वितरित करण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देत आहे:-

| **वाढीव मोबदला मुख्य लेखाशिर्ष २२४५ २४८१** | | | | |
|---|---|---|---|---|
| **अ.क्र.** | **लाभधारकाचे नांव** | **संपादित केलेल्या गावातील जमिन** | **एल.ए.आर क्र.** | **मोबदला रक्कम रू.** |
| १ | श्री.शंकर रामचंद्र परताळे | मौ.नारंगवाडी, ता. उमरगा, जि. उस्मानाबाद. | २३६/२००८ | ४८,६७८/- |
| २ | श्री.अशोक रामचंद्र पाटील | मौ.बाभळसुर, ता. उमरगा, जि. उस्मानाबाद | ४४५/२००५ | ५६,८६२/- |
| ३ | श्री.रामा नामदेव मोरे | मौ. माकणी, ता. लोहारा, जि. उस्मानाबाद | ७०८/२००९ | ७३,०४०/- |
| ४ | श्री.सुग्रीव नारायण सुरवसे, बालाजी तुकाराम सुरवसे, अयोध्याबाई मारूतीराव (मयत) वारस मारूतीराव भालेराव, यशोदाबाई पांडूरंग (मयत) वारस अशोक पांडुरंग शिंदे,विठाबाई काशिनाथ कांबळे | मौ.नारंगवाडी, ता. उमरगा, जि. उस्मानाबाद | २५२/२००८ | ७०,९५,७१०/- |
| ५ | श्री.भैरवनाथ नामदेव चव्हाण (मयत) वारस नामदेव चव्हाण व श्रीमती लता पांडुरंग गोरे | मौ.तुंगी (बु.) , मौ ता.औसा, जि. लातूर | ९२६/२००० | १,२१,९९५/- |
| **एकूण** | | | | **७३,९६,२८५/-** |

२. उपरोक्त अ.क्र.१ येथील भूधारक श्री.शंकर परताळे यांच्या मोबदला परिगणन रकमेमध्ये रू. २०९१/- इतका फरक येत असल्याचे दिसते. विभागीय आयुक्त,औरंगाबाद यांनी श्री. शंकर परताळे यांच्या प्रस्तावाची फेरतपासणी करावी व असल्यास अधिकच्या मागणीचा प्रस्ताव शासनास सादर करावा.तसेच अ.क्र.४ च्या प्रस्तावातील मूळ परिगणित रक्कम वितरित करण्यात येत असून ३% आस्थापना खर्च व ७% सोईसुविधा खर्चाच्या मागणीबाबत विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांचेकडून अधिकची माहिती मागविण्यात येत आहे.

३. याबाबतीत होणारा खर्च हा “मागणी क्रमांक सी-६, मुख्य लेखाशिर्ष २२४५-नैसर्गिक आपत्तीच्या निवारणसाठी सहाय्य, ०६-भुकंप, १०१-अनुग्रह सहाय्य (९२)-राज्य आपत्ती प्रतिसाद

निधीच्या मानकाव्यतिरिक्त खर्च (९२)(०१) भुकंपग्रस्तांसाठी सहाय्य ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२२४५ २४८१)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. हा निधी ज्या प्रयोजनासाठी वर्ग करण्यात आला आहे, त्याच प्रयोजनासाठी त्याचा वापर होत आहे याची विभागीय आयुक्त यांनी खातरजमा करावी. ज्या प्रयोजनासाठी निधी वितरीत करण्यात आला आहे त्याबाबतची माहिती विभागीय आयुक्त यांनी या विभागाकडे मासिक खर्चाचा अहवालासोबत सादर करावी. निधीच्या वाटपाचे लेखे, अभिलेखे/ नोंदवहया विहित कार्यपध्दतीनुसार अनुदान आहरित व वितरीत करणा-या कार्यालयाच्या स्तरावर अदययावत ठेवण्यात यावे. त्याचप्रमाणे होणा-या प्रत्यक्ष खर्चाचे पत्र पुढील महिन्याच्या १० तारखेपर्यंत विभागीय आयुक्त यांनी एकत्रित महसुल व वन विभागास (कार्यासन म-११) न चुकता सादर करावी. झालेल्या खर्चाची महालेखाकार कार्यालयात नोंदविण्यात आलेल्या खर्चाशी पडताळणी करुन त्याबाबतचे प्रमाणपत्र या विभागाकडे तात्काळ सादर करावे. तसेच कोणत्याही परिस्थितीत मंजूर निधीच्या मर्यादेपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता घ्यावी व हा खर्च तात्काळ करण्यात यावा. वितरीत करण्यात आलेल्या अनुदानातून जर काही रक्कम खर्ची पडणार नसेल तर ती रक्कम विहित वेळेत शासनास प्रत्यार्पित करण्यात यावी.

५. नियंत्रक अधिका-यांनी अनुदान वाटपाची एक प्रत अपर मुख्य सचिव (मदत व पुनर्वसन) यांना न चुकता सादर करावी. आहरण व संवितरण अधिका-यांनी कोषागार / उपकोषागार यांच्याकडे पाठविण्यात येणा-या बिलासोबत जोडल्या जाणा-या संगणक चिठ्ठीमध्ये गौण / उपशिर्षाच्या "संगणक यंत्र" संकेतांकाचा न चुकता उल्लेख करावा, असे आदेश कृपया संबंधित अधिका-यांना नियंत्रण अधिका-यांनी दयावेत. तसेच कोषागारातून / उपकोषागारातून आहरित केलेल्या रकमेचा अहवाल शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१२११५२१२९१३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sandesh Prabhakar Melekar

Digitally signed by Sandesh Prabhakar Melekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=911446f56b44612f3ddf7d67f8bba488d993c1aa6a81fb04d013eba5babc82c1, serialNumber=378335c3efca4185c590d524c45405851510c5cd1f58d33aaf8ad640f25eed9d, cn=Sandesh Prabhakar Melekar
Date: 2019.01.21 15:23:33 +05'30'

**( सं.प्र. मेळेकर )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद
२) जिल्हाधिकारी, उस्मानाबाद/लातूर

३) भूसंपादन अधिकारी तथा उप विभागीय अधिकारी, उमरगा,जि. उस्मानाबाद

४) भूसंपादन अधिकारी तथा उप विभागीय अधिकारी, औसा-रेणापूर, जि. लातूर

५) कोषागार अधिकारी, उस्मानाबाद/लातूर.

६) महालेखापाल १/२ ( लेखा व अनुज्ञेयता /लेखा परिक्षण) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपुर (प्रत्येकी ३ प्रती)

७) वित्त विभाग (अर्थसंकल्प-४/व्यय-१/अर्थोपाय कक्ष), मंत्रालय, मुंबई-३२.

८) मा.मंत्री (भु.पु.) यांचे खाजगी सचिव यांना माहितीस्तव सादर.

९) अवर सचिव/ कार्यासन अधिकारी (ब-१/म-३/म-११/पीएसी/पीएसी-१ कार्यासने), महसूल व वन विभाग, मंत्रालय,

१०) निवड नस्ती, आव्यप्र-२.